**शैक्षणिक वर्ष २०१४-१५पासून अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मान्यतेनुसार डिप्लोमा इन हॉटेल मॅनेजमेंट अँड केटरींग टेक्नोलॉजी प्रवेश क्षमता ६० ही पदविका अभ्यासक्रमाची संस्था बंद करण्यास शासन मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१५/(१६१/१५) /तांशि-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय,विस्तार भवन, मुंबई-४०००३२.

तारीख: १३ ऑक्टोंबर, २०१५

वाचा —

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. १०/एनजीपी / प्र.घट/ २०१५/८७६, दिनांक ६ ऑगस्ट, २०१५

२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. १०/ एनजीपी/ २०१५-१६ /अ.बंद /९८४ दिनांक ४ सप्टेंबर, २०१५

३) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेचे पत्र क्र: Western/१- २१०२०५५१९१/ २०१४/ Closure-१ दि.११ जुलै,२०१५

प्रस्तावना —

शैक्षणिक वर्ष २०१४-२०१५ पासून अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मान्यतेनुसार, डिप्लोमा इन हॉटेल मॅनेजमेंट अँड केटरींग टेक्नोलॉजी प्रवेश क्षमता ६० ही पदविका अभ्यासक्रमाची संस्था (Progressive Closure) बंद करण्यास संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी प्रस्तावीत केल्यानुसार शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय—**

शैक्षणिक वर्ष २०१४-२०१५ पासून अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मान्यतेनुसार परिशिष्ठ-A मधील दर्शविण्यात आलेल्या डिप्लोमा इन हॉटेल मॅनेजमेंट अँड केटरींग टेक्नोलॉजी प्रवेश क्षमता ६० ही पदविका अभ्यासक्रमाची संस्था (Progressive Closure) बंद करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) बंद करावयाच्या संस्थेतील अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्रे, विद्यार्थ्यांचे पत्ते,फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने मंडळाकडे सूपूर्द करणे आवश्यक राहील.

२) संबंधित संस्थेतील नियुक्त शिक्षक वर्ग/कर्मचारी यांच्या सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेली सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील. भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

३) संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापी थकबाकी असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

४) संस्थेमध्ये सदर अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

५) संबंधित संस्था बंद केल्यानंतर त्या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना परिक्षेस बसण्याची इच्छा असल्यास त्याची पर्यायी व्यवस्था करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

६) संबंधित संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक प्रदानाचे भुगतान करणे संस्थेस बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१३१६१८१५६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Audumbar Dharurkar

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2015.10.14 12:48:55 +05'30'

**( संजय औ.धारूरकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, वांद्रे (पू), मुंबई-५१,

३. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय(मुंबई), (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

४. द नव बालोद्यान ट्रस्ट संचालित, कोहिनूर इन्स्टिटट्युट ऑफ एचएमसीटी, भिकोबा वामन पठारे मार्ग, शिवाजी पार्क, दादर(प), मुंबई-४०००२८ (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).

**प्रत माहितीसाठी:-**

१. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली-११०००१.

२. सहाय्यक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्युरन्स बिल्डींग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई.

शासन निर्णय क्र. मान्यता-२०१५/ (१६१/१५)/ तांशि-५ , दिनांक १३.१०.२०१५ सोबतचे सहपत्र परिशिष्ट-A

List of Diploma Institute approved for Closure of Institute for Academic Year 2014-15.

| Sr. No. | DTE Code | District | Institute Name | Institute Address | Institute Type | Programme | Level | Shift | Full Time/ Part Time | Course | Affialting Body | Approved Intake 2013-14 | Approved Intake 2014-15 |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 3057 | Mumbai | KOHINOOR INSTITUTE OF HOTEL MANAGEMENT AND CATERING TECHNOLOGY | B.W.PATHARE MARG, SHIVAJI PARK, DADAR WEST,MUMBAI-400028 | Unaided Private | ENGINEERING AND TECHNOLOGY | DIPLOMA | 1st Shift | Full Time | HOTEL MANAGEMENT AND CATERING TECHNOLOGY | MAHARASHTRA STATE BOARD OF TECHNICAL EDUCATION | 60 | 0 |